**प्रशासकीय मान्यता**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर येथील अतिदक्षता विभागातील विद्युत विषयक कामे करण्यासाठी अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : जीसीएल-२०१७/प्र.क्र.४२७/प्रशा-१**
गोकुळदास तेजपाल रुगालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई.
दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :** संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.: संवैशिवसं/शावैमला/२७लहा.बांध/विद्युतीकरण/१७७९७/प(आय)/१७, ११३३६ दिनांक २९.९.२०१७.

**शासन निर्णय :**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर येथील अतिदक्षता विभागातील विद्युत विषयक कामे करण्यासाठी व वातानुकुलीत यंत्राची सोय उपलब्ध करुन देण्याबाबत खालील तक्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे येणाऱ्या एकूण रुपये १०,३०,४९१/- (अक्षरी रुपये दहा लक्ष तीस हजार चारशे एक्याण्णव फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्थापत्य दुरुस्ती बांधकामाचे नाव | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविलेली किंमत रुपये |
|---|---|---|---|
| १) | Providing Additions and Alterations to E.I. Lighting in Newly Constructing I.C.U | २,५२,६७९ | ३,४१,०२० |
| २) | Providing E.I. for Power Wiring in newly constructing I.C.U. | २,४०,०४० | ३,२३,९६२ |
| ३) | Providing shifting of A.C. Units from old I.C.U. to newly constructed I.C.U. | २,७०,८२४ | ३,६५,५०९ |
| | **एकूण** | **७,६३,५४३** | **१०,३०,४९१** |

**अटी व शर्ती :-**

१) अंदाजपत्रके सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित असल्याने, त्या दरांमध्ये तत्कालीन प्रचलित करांचा समावेश असण्याची शक्यता असून एकूण किंमतीमध्ये वस्तु व सेवा कराची तरतूद समाविष्ट केल्याने करांची द्विरुक्ती होणार नाही, याची सक्षम अधिकाऱ्यांनी खातरजमा करावी.

२) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

४) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही कार्यकारी अभियंता, सा.बां.विद्युत विभाग, लातूर यांच्याकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना संबंधीत संस्थेच्या अधीष्ठाता यांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

५) संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ७.२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

२. सदरहू कामास प्रत्यक्षात निधीची तरतूद झाल्याशिवाय सुरुवात करु नये. सदरहू काम संचालनालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर या संस्थेस सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षामध्ये खालील लेखाशीर्षाअंतर्गत उपलब्ध असणाऱ्या निधीमधून करण्यात यावे.

मागणी क्रमांक एस-१
२२१०-वैद्यकीय शिक्षण व सार्वजनिक बांधकाम आरोग्य
०१-नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
११०-रुग्णालये व दवाखाने
०२-मुफसल रुग्णालये व दवाखाने मुफसल क्षेत्रातील शासकीय अध्यापक रुग्णालये,
(०२) (१६) सर्वोपचार रुग्णालय लातूर (२२१० ५१०१)
२७- लहान बांधकामे

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८२/इमा-३, दिनांक ०५.०६.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१०१७०४०००३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.10.10 17:58:55 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
३) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई (इमारत-३) मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग,लातूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
७) निवडनस्ती (प्रशा-१).